# लायब्ररी वर प्रेम करणारा माणूस

## एंड्रू करनेगी

**एंड्रू लार्सन, चित्र : कट्टी**



"जेंव्हा आपण लायब्ररीचा दरवाजा उघडतो तेंव्हा आपल्या लक्षात येतं अनेक संधी आपली वाट पाहत आहेत"

ह्या वाक्यावर एंड्रू करनेगीचा संपूर्ण विश्वास होता.

स्कॉटलँड मधे जन्मलेला एंड्रू करनेगी अमेरिकेत गेला तोच मुळी स्थलांतरीत गरीब तरुण म्हणूनच. त्याने खूप मेहनत घेतली आणि आलेल्या प्रत्येक संधीचा फायदा घेतला. ओघाने त्याने स्टीलच साम्राज्य निर्माण केलं. त्याची आधुनिक अमेरिकेच्या निर्मितीला खूप मदत झाली. काही वेळातच तो एक अत्यंत श्रीमंत माणूस बनला. पण करनेगी लायब्ररीचा आपल्या यशातला फार महत्वाचा हिस्सा आहे हे कधीही विसरला नाही.त्याने आपली संपत्ती जगभर सार्वजनिक वाचनालय बांधण्यात वापरली ज्या योगे लोकांना आपली स्वप्ने पूर्ण करण्यात मदत होईल.

एक माणूस ज्याने लायब्ररी (वाचनालय) वर जीवापाड प्रेम केलं. एंड्रू करनेगीची खरी प्रेरणादायी गोष्ट आहे. त्याने मेहनत करून कमावलेलं आणि समाजाने जी बक्षिसं त्याला दिली ते समाजाचं ऋण समाजाला परत केलं.



# लायब्ररी वर प्रेम करणारा माणूस

**एंड्रू करनेगी**

मराठी : अर्चना



एंड्रू करनेगी चा जन्म स्कॉटिश गावात एक छोट्याशा दगडी घरांत झाला.

कापड बनवायच्या मशीन ने खालची खोली पूर्ण व्यापली होती म्हणून अन्ड्रीऊ आणि त्याचे कुटुंब वरती राहायचे. त्यांचे जेवण खाण झोप सगळे तिकडेच होत असे.

एंड्रू चे वडील विणकर होते ते अतिशय तलम कपडा विनायचे पण लोकांना स्वस्त आणि कमी दर्जाचा कापडा हवा असायचा.

एंड्रूची आई घराला हातभार लावण्यासाठी मिठाई, कोबी, गाजर असे घरगुती जिन्नस विकायची.



छोटयाशा एंड्रूला शिक्षणाची भूक होती. तो वयाच्या आठव्या वर्षी एक खोली असलेल्या शाळेत जाऊ लागला.

त्याचे शिक्षक खूप कडक होते पण एंड्रूला ते आवडायचे. हुशार विद्यार्थी बनण्यासाठी तो खूप अभ्यास करायचा.



एका संध्याकाळी पाव आणि गाजरं खाता खाता दुःखी आणि उदास आवाजात वडील म्हणाले, “माझं इतकं तलम आणि सुंदर कापड कोणी खरेदी करेल असं वाटत नाही.”

त्यावर त्याची आई म्हणाली, “आपल्याला काहीतरी केलं पाहिजे. माझ्या बहिणी अमेरीकेला गेल्या आहेत, आपणही गेलं पाहिजे.”

एंड्रू बारा वर्षांचा होता तेंव्हा त्याचे कुटुंब अमेरिकेला स्थलांतरित झाले. नवीन आयुष्याला सुरवात करायचे ते योग्य ठिकाण होते.

इतर अनेक सहप्रवाशां बरोबर करनेगी कुटुंब सुध्दा जहाजातून प्रवास करत होते. तेथील जेवण शिळं, हवा दूषित, आणि पाणी अशुद्ध होत. पण एंड्रू आणि त्याचा भाऊ समुद्री डाकू डाकू खेळण्यात मग्न होते.



तब्बल सात आठवडे समुद्रात काढल्यावर करनेगी कुटुंब न्यूयॉर्कला पोचले.

पुढे तीन आठवडे लागले पिटर्सबर्गला पोचायला जिथे एंड्रूची मावशी राहायची.



पिटर्सबर्ग मध्ये उद्योग धंदे वेगात वाढत होते.
फॅक्टरी आणि मिल मुळे हवा दूषित होत होती.

नवीन उद्योग धंद्यांमुळे रोजगार वाढत होता
कामासाठी नवीन माणसांची गरज होती.



एंड्रू लगेच तिकडे कामाला लागला त्याला सुद्धा आपल्या कुटुंबाला मदत करायची होती. अँकर कॉटन मिल मधे त्याला आणि त्याच्या वडिलांना नोकरी मिळाली. जे काम एंड्रू चे वडील हाताने करीत इकडे ती कामं मोठ्ठाल्ली मशीन करत होती.

त्या मिल मधे तो बॉबीन भरायचे काम करायचा. संपुर्ण मिल फिरून जिथे जिथे बॉबीन भरलेली असतील ती काढून रिकामी बॉबीन घालायचा. तो दिवसाचे बारा तास काम करायचं फक्त न्याहारीला आणि जेवायला अगदी थोडा वेळ मिळायचा.



एक वर्षाच्या आतच एंड्रूला नवीन आणि चांगली नोकरी मिळाली इथे त्याला निरोप्याच काम मिळालं.

एंड्रूने तिकडच्या रस्त्यांच्या नकाशाचा बारकाईने अभ्यास केला तिथली लोकल दुकानं उद्योगगृह यांचे पत्ते तोंडपाठ केले. आता तो कुठेही टपाल अतिशय वेगाने पोचवीत असे. त्याने त्या शहरातल्या उद्योगपतींची माहिती मिळवली आणि व्यक्तिगत त्यांना भेटू लागला. थोडेच दिवसात तो पिटर्सबर्ग चा सगळ्यात हुशार निरोप्या म्हणून ओळखला जाऊ लागला.





फावल्या वेळात टेलिग्राफ मशीन कसं
चालतं ह्याचा अभ्यास करू लागला.

एंड्रूच्या लक्षात आलं की शिक्षण हि आपल्या भविष्याची गुरू किल्ली आहे. नोकरीमुळे तो शाळेत जाऊ शकला नाही.

तो वाचु शकत होता पण पुस्तकं खूप महाग होती. पिटर्सबर्ग किंवा अशा अनेक शहरांत सर्वसामन्यां साठी वाचनालय उपलब्ध नव्हती जिथे कोणी ही सामान्य माणूस फुकट पुस्तक घेऊ शकेल. नशिबाने तिकडे एक सद्गृहस्थ होते ज्यांना तरुण कामगारांना मदत करण्याची इच्छा होती. कॉलॉनेल अँडरसन ह्या तिथल्या लोकल व्यापाऱ्याने त्याचे खाजगी वाचनालय शनिवारी दुपारी सगळ्यांसाठी उघडले.

एंड्रूला कॉलॉनेल अँडरसन चे वाचनालय आवडले, त्यातला उबदारपणा आणि प्रकाश ही आवडला. तो तिथली पुस्तकं घेऊ लागला वाचू लागला. जेव्हढा तो वाचत गेला तेव्हढं त्याच ज्ञान वाढतं गेलं.

वयाच्या सतराव्या वर्षी आपल्या ज्ञानाचा उपयोग करून पेन्सिलविनिया रेलरोड कंपनी मध्ये टेलिग्राफ ऑपरेटर (ताल यंत्र चालक) ही नोकरी मिळवली.

तो अनेक ठिकाणाला भेट देई. नवीन-नविन कल्पना त्याच्या डोक्यात येत जसं टेलिग्राफ ऑफिस चोवीस तास उघडे ठेवणे.

एंड्रू ने खूप मेहनत केली. तो पंचविसाव्या वर्षीच एक पदाधिकारी बनला.



पेनेन्सिलव्हेनिया रेलरोड कंपनी मधे तो संपूर्ण कुटूंबाला पुरेल एव्हढे पैसे मिळवत होता. जे काही थोडे पैसे वाचायचे ते तो बचत खात्यात घालून अजून पैसे मिळवायचा.

एंड्रू ला पक्का विश्वास होता की रेल्वे आपल्या भविष्याची चावी आहे, म्हणून त्याने उडरुफ स्लीपिंग कार कंपनी ह्या कंपनीत पैसे गुंतवले. तेल, स्टील आणि लोखंड ह्या कंपनी चे शेअर्स तो धडाधड विकत घेऊ लागला शिवाय अमेरिकेत रेल्वे आणि पुल बांधणारे मदतीसाठी हात मागत होते त्यांना जसा फायदा होई त्याला सुद्धा फायदा होई

तो जेंव्हा पस्तीस वर्षांचा झाला एंड्रू करनेगी ह्याच नाव श्रीमंत लोकांत गणल जाऊ लागलं. गरजे पेक्षा जास्त पैशाचं तो काय करायचा?




डनफरलाइन
करनेगी
लाइब्रेरी
DUNFERMLINE CARNEGIE LIBRARY

देऊन टाकायचा.

एंड्रू करनेगी कॉलॉनेल अँडरसनचा दयाळु पणा विसरला नाही. त्याचं वाचनालय त्यातली उब आणि प्रकाश, किती प्रेमाने तो तिकडची पुस्तकं घ्यायचा आणि आपली वाचनाची भूक भागवायचा. वाचनाचा आणि शिकण्याचा आनंद तो कधीही विसरला नाही.

एंड्रू करनेगी आपला पैसे लोकांसाठी वाचनालय उघडण्याच्या कामी लावला ज्या मुळे ज्यांना पुस्तकं परवडत नाहीत ते ह्याचा फायदा घेऊ शकतील.

त्याने पहिलं मोफत वाचनालय आपल्या जन्म स्कॉटिश गावी उघडलं पण तिथेच तो थांबला नाही.





एंड्रू करनेगी यांनी 2500 मोफत वाचनालये उघडली शहरं, गावं द युनायटेड किंगडम, कॅनडा, युरोप, कॅरेबियन, ऑस्ट्रेलिया न्यूझिलँड ह्या ठिकाणी ती वाचनालय आहेत त्यात पुस्तकं आहेत. करनेगी वाचनालय ह्या नावाने आहेत कदाचित तुमच्याही आसपास असेल.

अमेरिकेत एक स्थलांतरित म्हणून गेलेला एंड्रू करनेगी जगातला सर्वात श्रीमंत माणसांपैकी एक झाला.

तो श्रीमंती वाटण्यासाठी आहे अस मानायचा. मदतीची गरज असलेल्यांना मदत करायला त्याला फार आवडायचं.

एंड्रू करनेगी यांनी लोकांसाठी अनेक वाचनालये बांधली ह्या भावनेने की त्याच्याच सारखा कोणी वाचनवेडा आला तर पैशा अभावी त्याची शिकण्याची उमीद राहून जाऊ नये.



# एंड्रू करनेगी की विरासत



एंड्रू कारनेगी का जन्म 1835 में डनफरलाइन, स्कॉटलैंड में हुआ. उनका देहांत 1919 में लेनोव, मेसाचुसेट्स में 83 वर्ष की आयु में हुआ.

1848 में एंड्रू कारनेगी, अमरीका में एक युवा, गरीब आप्रवासी जैसे आया था. वो बड़ा होकर अमरीका के सबसे अमीर लोगों में से एक बना. वैसे एंड्रू कारनेगी ने अमरीका के सबसे बड़े स्टील कारखाने स्थापित किए. पर बहुत से लोगों के अनुसार उसकी असली विरासत उन दानी संस्थाओं के स्थापन में थी जो आज भी हमारे जीवन को समृद्ध कर रही हैं.

एंड्रू कारनेगी ने 1911 में कारनेगी कारपोरेशन स्थापित किया जो पूरी दुनिया में शांति और शिक्षा को बढ़ावा देता है. यह कंपनी आज भी बहुत महत्वपूर्ण कर रही है. कारनेगी कारपोरेशन के धन से छोटे बच्चों के लिए शैक्षणिक प्रोग्राम बन रहे हैं. कारनेगी कारपोरेशन ने सेसमीस स्ट्रीट प्रोग्राम को बनाने में भी मदद की.

वैसे एंड्रू कारनेगी का देहांत बहुत पहले हो गया पर उसका धन आज भी लोगों की मदद कर रहा है. उसकी कहानी से एक बात स्पष्ट होती है - कि लोगों की मदद करके ही हम समाज में बदलाव ला सकते हैं.

एंड्रू ज़रुरतमंदों की मदद करते थे. पर उनके खुद के कारखानों में मज़दूरों के साथ रिश्ते काफी उलझे हुए थे. कारनेगी स्टील कंपनी के मालिकों और मज़दूरों में कई बार झड़प हुई. कंपनी ने मज़दूरों के आंदोलन को तोड़ा और कुचला. उससे एंड्रू कारनेगी का धंधा और चमका. पर उसके बाद से मज़दूरों के मसीहा होने की एंड्रू कारनेगी की छवि धूमिल पड़ी.



*1892 में पेनसिलवेनिया स्थित कारनेगी स्टील प्लांट में मज़दूरों और मैनेजमेंट के बीच हिंसात्मक झड़प हुई!*

*ब्रुकलिन पुल, न्यू यॉर्क सिटी*



ब्रुकलिन पुल का निर्माण एंड्रू कारनेगी की कंपनी में बने स्टील से हुआ. 130 वर्ष बाद भी वो पुल भी पुख्ता खड़ा है. इस पुल पर रोज़ाना एक लाख बीस हज़ार गाड़ियां, 2600 साइकिल और 4000 पैदल लोग गुज़रते हैं.

एंड्रू कारनेगी की पत्नी लोइसे को संगीत से प्रेम था. लोइसे और एंड्रू ने मिलकर कारनेगी-हाल बनवाया जिससे संगीतकार और आर्टिस्ट अपनी कला का प्रदर्शन कर सकें. कारनेगी-हाल 1891 में बना. 125 साल बाद भी वहां दुनिया के सबसे अच्छे संगीत कार्यक्रम होते हैं.



*कारनेगी-हाल, न्यू यॉर्क सिटी*



*मैसाचुसेट्स में कारनेगी लाइब्रेरी 1903 में शुरू हुई और वो आज भी चालू है.*

एंड्रू कारनेगी का मानना था कि अमीरों को अपने धन का उपयोग पूरे समाज के भले के लिए करना चाहिए. उसने सबसे पहले स्कॉटलैंड में अपने गांव में एक पुस्तकालय बनवाया. फिर उसने इंग्लैंड और आयरलैंड में 600 से अधिक पुस्तकालयों का निर्माण करवाया. अगर लोकल लोग पुस्तकें खरीदने, स्टाफ की तनख्वाह देने और लाइब्रेरी का संचालन करने को तैयार होते तो, एंड्रू कारनेगी वहां लाइब्रेरी का निर्माण करने के लिए धन दे देता. लोकल लोगों को इस बात की भी ज़िम्मेदारी लेनी पड़ती थी कि लाइब्रेरी सब लोगों के लिए निशुल्क यानि फ्री हो.



एंड्रू करनेगी ने पहिलं मोफत वाचनालय आपल्या जन्म स्कॉटिश गावी उघडलं पण तिथेच तो थांबला नाही.

